२०११०४१९१२०३४१००१

नागरी आदिवासी वस्ती सुधारणा योजनेअंतर्गत **डहाणू** नगरपरिषदेस **(जि.ठाणे)** सन २०१०-११ मध्ये अनुदान वितरण करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग

**शासन निर्णय** क्र.आवसु-२०१०/प्र.क्र. ९२/नवि-४

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- ३१ मार्च, २०११

**वाचा :-** १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.आवसु-१००६/प्र.क्र.८०/नवि-४ दिनांक ६ फेब्रुवारी, २००७

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. नावयो-२०११/प्र.क्र.८४/का.१२ दिनांक ३१ मार्च, २०११

**शासन निर्णय :-** नागरी आदिवासी वस्ती सुधारणा योजनेकरीता सन २०१०-११ या आर्थिक वर्षामध्ये एकूण **रुपये ५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी )** इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. सदर उपलब्ध निधीपैकी **डहाणू नगरपरिषदेस** (जि. ठाणे) खाली नमूद केलेल्या कामांना **रु.३,५२,४०,२८०/- (रुपये तीन कोटी बावन्न लक्ष चाळीस हजार दोनशे ऐंशी)** इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजपत्रकीय रक्कम रुपयात |
|---|---|---|
| १ | सरावली मानफोड पाडा आदिवासी बालकुटीर सोसायटी मोहन नगर गुजराती शाळा येथे विद्युत पोल उभारणे | ८११,७४७/- |
| २ | आंबेमोरो येथे नामकोड गुरुजी यांचे घर ते रेल्वे गेट क्र. ५७ पर्यंत पथदिवे बसविणे | ५,८५,११५/- |
| ३ | आगर आंबेमोरा चार रस्ता ते रेल्वे गेट क्र. ५७ पर्यंत पथदिवे बसविणे | रु.५,०८,६५७/- |
| ४ | वॉर्ड क्र. ६ मध्ये सरावली सावटा मुख्य रस्ता पासून ते सेग्रीगेशन सेंटर ते रामू धेंडी यांच्या शेता पर्यंत रस्ता मजबुतीकरण व डाबरीकरण करणे | रु.४९,६६,१२५/- |
| ५ | वॉर्ड क्र.१ मध्ये हबिबुल्ला सौदागर यांच्या शेता जवळ कॉंक्रीट रस्ता करणे | रु. ४९,२७,०६६/- |
| ६ | वॉर्ड क्रमांक-१ मध्ये डहाणू रोड ते आगर रस्त्यावरील दिनेश माळी यांच्या शेता जवळ रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे | रु. ४९,६८,०७७/- |
| ७ | वॉर्ड क्रमांक-१ मध्ये कंकाडी पुल ते घाचीच्या नाका पर्यंत रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे | रु. ४९,०८,६३६/- |
| ८ | वॉर्ड क्रमांक-६ मध्ये रामु धोडी यांच्या शेता जवळ सी. डी वर्क करणे | रु. १८,४९,३९२/- |
| ९ | आगर मुख्यरस्ता पासून आंबेमोराकडे जाणा-या रस्त्याच्या डाव्या बाजूला श्रीमती पार्वती राऊत यांच्या शेतापासून ते नारायण पाटील यांच्या शेतापर्यंत साईटपट्टी कॉंक्रीट करणे | रु. २०,३२,१७८/- |

| | | |
|---|---|---|
| १० | वॉर्ड क्रमांक-१ मध्ये आगर आंबेमोरा नाका जवळ रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे | रु. ४९,४१,३६१/- |
| ११ | आगर मुख्यरस्ता पासून आंबेमोराकडे जाणा-या डाव्या बाजूला श्री. भिखु माळी यांच्या वाडी पासून ते जिल्हा परिषद शाळे जवळ साईड पट्टी कॉंक्रीट करुन रस्ता रुंदीकरण करणे | रु. ४७,४१,०४६/- |
| | **एकूण** | रु.३,५२,४०,२८०/- |

०२. जिल्हाधिकारी, ठाणे यांनी सदर योजनेस शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.आवसु-१००६/प्र.क्र.८०/नवि-४ दिनांक ६ फेब्रुवारी, २००७ मधील मार्गदर्शक तत्वानुसार व विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार पुढील कार्यवाही करावी.

०३. सदरचे अनुदान **डहाणू नगरपरिषद यांना** वितरीत करण्यासाठी **श्री. अ. रा राजपूत. कार्यासन अधिकारी, नगरविकास विभाग यांना 'आहरण व संवितरण अधिकारी 'तसेच श्री. का. तु. सातकर उपसचिव यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.** अधिदान व लेखाधिकार, मुंबई यांनी वरील रक्कमेचा धनादेश जिल्हाधिकारी ठाणे यांच्या नावे काढावा व जिल्हाधिकारी ठाणे यांनी सदर निधी डहाणू नगरपरिषदेस तात्काळ वितरीत करावा व झालेल्या खर्चाचे विनियोग प्रमाणपत्र आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, आदिवासी विकास विभाग तसेच नगर विकास विभागाकडे सादर करावे.

०४. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्र.टी-५, मुख्यलेखाशिर्ष : २२१७- नगर विकास- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- ८० सर्वसाधारण- ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना- (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) नागरी आदिवासी वस्ती सुधारणा (२२१७ १२५९) ३१-सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ मध्ये मंजूर केलेल्या तरतुदीतून भागवावा.

०५. सदरचे आदेश आदिवासी विकास विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक ३१ मार्च, २०११ च्या आदेशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

३१/३/२०११

**( आर्य. एम. मोरे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त,आदिवासी विकास,.नाशिक
जिल्हाधिकारी, ठाणे
अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे
उपसंचालक, नगर रचना, ठाणे
सहाय्यक संचालक, नगर रचना, डहाणू
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू

अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
मुख्याधिकारी, नगरपरिषद डहाणू, जि. ठाणे
वित्त विभाग (अर्थ-१९) मंत्रालय, मुंबई
कार्यासन- (का-१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
लेखा अधिकारी, नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी नवि-५,
नवि-८ यांना शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर प्रत उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने अग्रेषित
निवडनस्ती (नवि-४)